

# मित्राला मेजवानी

मूळ लेखक : माहदोख्त कशकौली
मराठी भाषांतर : मिलिंद परांजपे
चित्रकार : समिरा अलिखानजादेह

ज्योत्स्ना प्रकाशन



Originally published as: Mah Dar Jangal
Author: Mahdokht Kashkouli    Illustrator: Samira Alikhanzadeh


मराठी आवृत्ती : मित्राला मेजवानी
प्रकाशक : मिलिंद ल. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०
मुंबई ऑफिस : मोहन बिल्डिंग, १६२ ज.शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४

पहिली आवृत्ती : ऑक्टोबर २००७
मुद्रक : रिच प्रिंटस्, २७२ नारायण पेठ, पुणे ४११०३०
**मूल्य रुपये ३०/-**    ISBN 81-7925-165-2



अंधार पडला की घुबड आपल्या ढोलीबाहेर येई. तोपर्यंत सारे पक्षी आपापल्या घरट्यात विसावलेले असत. बाहेर आल्यावर घुबड सर्व प्रथम आकाशात पाही. आकाशात चंद्र असला की त्याला बरं वाटे. मग तो झाडाच्या सर्वात वरच्या फांदीवर जाऊन बसे. रात्रीच्या अंधारात चंद्र हा त्याचा एकमेव सोबती होता. पहाट झाली की घुबड आपल्या ढोलीत जाई.

गरुड जागा झाल्यावर उंच आकाशातून भराऱ्या मारू लागे. खाली पाहताना त्याच्या लक्षात येई सर्वजण उठले आहेत; फक्त घुबड झोपलं आहे.



मग गरुड त्याच्या ढोलीच्या जवळून एक फेरी मारे. रात्री जंगलावर लक्ष ठेवणाऱ्या व दिवसा झोपणाऱ्या या पक्ष्याबद्दल त्याला कुतूहल होतं. गरुडाला वाटे याच्याशी मैत्री करावी. पण मैत्री करायला, दिवसा ते कधीच जागं दिसत नसे.

एक दिवस धीर करून त्याने झोपलेल्या घुबडाला हाक मारली. 'अरे, झोपला आहेस का अजून? बाहेर हवा बघ किती छान पडली आहे. चल उठ, उंच आकाशात एक फेरी मारून येऊ.'





घुबडानं जराशा पापण्या उघडल्या नि ते म्हणालं, 'तुला माहीतच आहे, मी रात्री जागा असतो. रात्रीच्या वेळी मी साऱ्या जंगलावर लक्ष ठेवतो. आता माझी झोपायची वेळ आहे. तुला माझ्याशी बोलायचं असलं तर रात्री ये.'

'घुबडा, मला तुझ्याशी मैत्री करायची आहे. त्या समोरच्या डोंगरावरच्या उंच कड्यावर माझं घरटं आहे.'





'ठीक आहे, रात्री ये तू. मी तुझ्यासाठी काहीतरी छान पदार्थ बनवीन.' गरुडाला आश्चर्यच वाटलं. त्याने विचारलं, 'माणसासारखं जेवणही करता येतं तुला?'

नेहमी नाही करत, पण तुझ्या सारखा कोणी खास पाहुणा येणार असेल तर बनवतो कधीतरी.

त्या दिवशी कधी नव्हे ते गरुड रात्र होण्याची वाट पाहत होता.



संध्याकाळ झाल्यावर घुबडाला प्रश्न पडला आता गरुडासाठी जेवण काय करायचं? इतक्यात त्याला कावळ्याचा आवाज आला. त्याने कावळ्याला हाक मारली नि विचारलं, 'आज माझ्याकडे जेवायला गरुड येणार आहे. त्याच्यासाठी काय खायला करू रे?'

कावळा म्हणाला, 'मला विचारणार असशील तर त्याच्यासाठी काहीही करू नको. तू त्याच्यासाठी काहीही आणि कितीही केलंस तरी त्याचं समाधान होणार नाही.'

घुबड म्हणालं, 'नाही नाही, काहीतरी करायलाच हवं मला त्याच्यासाठी. तो माझ्याशी मैत्री करायला येणार आहे.'





तिथून एक कोल्हा जात होता. त्याने हे सारं ऐकलं होतं, तो म्हणाला, 'हा कावळाच शिजव की त्याच्यासाठी, आवडेल गरुडाला!'

कोल्ह्याचे हे शब्द कानावर पडताच कावळा उडून गेला.

कावळा उडाला हे पाहून कोल्हा हसत म्हणाला, 'कावळा उडाला? काही काळजी करू नकोस. तुझ्याकडे तो तितर येतो ना, काप त्याला, छान चविष्ट असतो तो. आवडेल गरुडाला.'







कोल्ह्याचं हे बोलणं ऐकून घुबड जरा चिडलंच. 'काय म्हणालास? तुला माहीत आहे ना आमची किती मैत्री आहे ते? मागे एकदा मी झोपलेलो असताना माझं एक पिल्लू ढोलीतून खाली पडलं होतं, तेव्हा मी उठेपर्यंत त्याने माझ्या पिलाची काळजी घेतली होती. शिवाय रात्री आकाशात चंद्र नसताना जेव्हा मी एकटा जागा असतो, तेव्हा तो स्वत:हून माझ्या सोबतीला येऊन बसतो. अशा आपल्या मित्रालाच खायचं?'





कोल्हा हसला नि म्हणाला, 'भूक लागली ना, की यातलं काही खरं नसतं. तुला जमत नसलं तर तू नुसतं त्याला बोलाव, बाकीचं मी बघतो.'

घुबडाला हे पटणं शक्यच नव्हतं, पण त्याच्या डोक्यात एक वेगळीच कल्पना आली. ते म्हणालं, 'ठीक आहे, तू थांब जरा झाडाखाली.'





कोल्हा आनंदून गेला नि मनात म्हणाला, 'म्हणजे आज मला गरुड आणि तितर या दोघांची मेजवानी मिळणार तर!'


इतक्यात तितर अचानकच स्वतःहून घुबडाकडे आलं. ढोलीत शिरल्या शिरल्या त्याच्या लक्षात आलं, घुबड आज नेहमीसारखं शांत दिसत नाही. घर तर छान आवरलेलं आहे पण तरी काहीतरी गडबड आहे. त्याने विचारलं, 'काय रे, काय झालं?'


घुबड म्हणालं, 'मी ठीक आहे.
पण तू आधी निघ पाहू इथून चटकन. मी
उद्या तुझ्याकडे येईन, तेव्हा सांगेन सारं.'


तित्तर बाहेर पडलं मात्र, गरुड घुबडाकडं आला. ढोलीजवळच्या एका फांदीवर बसत तो घुबडाशी काही बोलणार इतक्यात कोल्ह्यानं फांदीवर उडी मारली. त्याची उडी चुकवत गरुडाने त्याच्यावर हल्ला केला. रात्रीच्या अंधारात दोघांची लढाई जुंपली.

घुबडाला अंदाज होताच. त्यानेही कोल्ह्यावर झेप घेतली.

दोघं एकत्र झाल्यावर कोल्ह्याचं काही चाललं नाही. त्याला गरुडाची मेजवानी मिळाली नाहीच पण घुबडाने मात्र गरुडाला छान मेजवानी दिली.

जाताना गरुड म्हणाला, 'कोल्हा दुष्ट असला तरी चवीला छान होता.'

रात्री गरुड गेल्यावर नेहमीप्रमाणेच घुबड साऱ्या जंगलावर पहारा करू लागलं.



